**कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमाकवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.**
**कै.(श्री.)शिवाजी दत्तात्रय यादव, सहायक शिक्षक**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२३/प्र.क्र.८३/टीएनटी-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २७ मार्च, २०२५

संदर्भ :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांचे पत्र क्र. जिपबी/शिविप्रा/प्रावि-१ अ /कावि/५२३४/२०२३, दि.०४/१०/२०२४
४) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/८०२/संकीर्ण/६८७९/२०२३, दिनांक १३/०३/२०२४ व पत्र क्र. पत्र क्र.प्राशिसं/८०२/संकीर्ण/२९४९/२०२४, दिनांक ०३/०४/२०२४

ज्ञापन :-

कै.(श्री.) शिवाजी दत्तात्रय यादव, सहायक शिक्षक, जि.प.प्राथ.शाळा जदीद जवळा, कें.एकदरा ता.माजलगाव जि.बीड यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक १९/०५/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) यादव, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र.(१) येथील दि. २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी संदर्भ क्र.(४) येथील पत्रांन्वये सादर केला आहे. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. बीड यांनी संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

३. कै.(श्री.) शिवाजी दत्तात्रय यादव, सहायक शिक्षक, जि.प.प्राथ.शाळा जदीद जवळा, कें.एकदरा ता.माजलगाव जि.बीड येथे दिनांक १४/०६/२०१४ पासून कार्यरत होते.

४. (१) गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती, माजलगाव (२) तालुका आरोग्य अधिकारी, पंचायत समिती, माजलगाव, (३) गटविकास अधिकारी, पंचायत समिती, माजलगाव यांचे दि. १६/०४/२०२१ रोजीच्या संयुक्त आदेशान्वये सदर आदेशातील अनु.क्र. १९२ येथे नमूद कै. (श्री.) यादव यांची कोव्हिड-१९ कालावधीत जदिद जवळा, ता. माजलगाव या गावात झिरो मिशन डेथ सर्वेक्षण अभियांतर्गत कुटुंबांचे सर्वेक्षण करण्याकरिता नियुक्त करण्यात आले होते. सदर

आदेशाच्या अनुषंगाने कर्तव्यावर हजर होण्याकरिता मुख्याध्यापक जि.प.प्राथ.शाळा जदीद जवळा, कें.एकदरा ता.माजलगाव जि.बीड यांनी दिनांक १६/०४/२०२१ पासून कार्यमुक्त केले आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी कै. (श्री.) यादव हे दि.२१/०४/२०२१ पासून ते दि. ३०/०४/२०२१ पर्यंत कोव्हिड कर्तव्यावर हजर असल्याबाबत प्रमाणित केले आहे.

५. कै.(श्री.) यादव यांची दिनांक दि.३०/०४/२०२१ रोजी केलेली कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटिव्ह आली असल्याचे दिसून येते. कै.(श्री.) यादव हे १) गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती, माजलगाव २) तालुका आरोग्य अधिकारी, पंचायत समिती, माजलगाव, ३) गटविकास अधिकारी, पंचायत समिती, माजलगाव यांचे दि. १६/०४/२०२१ रोजीच्या च्या आदेशानुसार कोव्हिड-१९ संबंधित झिरो मिशन डेथ सर्वेक्षण अभियांतर्गत कुटुंबांचे सर्वेक्षण करण्याकरिता दिनांक २१/०४/२०२१ ते दिनांक ३०/०४/२०२१ कालावधीत कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्यावर उपस्थित होते. ते कर्तव्यावर असताना दिनांक ०१/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ चाचणी पॉझिटीव्ह आला असून दि. १९/०५/२०२१ रोजी त्यांचा मृत्यु झालेलाआहे. त्यानुसार कै.(श्री.) यादव हे इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कोव्हिड-१९ कर्तव्यावर हजर असल्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांनी प्रमाणित केले आहे.

६. कै.(श्री.) यादव यांचेवर दि.२९/०४/२०२४ ते दि.०१/०५/२०२१ या कालावधीत रुदावाड हॉस्पीटल, माजलगाव येथे व दिनांक ०२/०५/२०२१ ते दि. ११/०५/२०२१ या कालावधीत माऊली कोव्हिड हॉस्पीटल येथे उपचार करण्यात आले आहेत व त्यापुढील उपचार सुमनजंली नर्सिंग होम, औरंगाबाद येथे दिनांक ११/०५/२०२१ ते दिनांक १९/०५/२०२१ या कालावधीत करण्यात आले आहेत. उपचारादरम्यान दिनांक १९/०५/२०२१ रोजी कोव्हिड-१९ आजाराने मृत्यु झाल्याचे वैद्यकीय अधिक्षक, सुमनजंली नर्सिंग होम, औरंगाबाद यांनी प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे प्रमाणित केले आहे.

७. कै.(श्री.) यादव यांचा दिनांक १९/०५/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे मृत्यु प्रमाणपत्र रजिस्ट्रार (जन्म व मृत्यू), महानगरपालिका, औरंगाबाद यांनी सादर केले आहे.

८. मा.सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, माजलगावं जि. बीड यांनी कै. (श्री.) यादव यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) गिता शिवाजी यादव (पत्नी) (२) समर्थ शिवाजी यादव (मुलगा) (३) संचिता शिवाजी यादव (मुलगी) (४) आश्राबाई दत्तात्रय यादव (आई) (५) दत्तात्रय बोळीराम यादव (वडील) यांना घोषित केले आहे.

९. कै.(श्री.)शिवाजी दत्तात्रय यादव, सहायक शिक्षक, जि.प.प्राथ.शाळा जदीद जवळा, कें.एकदरा ता.माजलगाव जि.बीड यांना २२०२ ०१७३- ०१ प्रा. शा.जि.प. ने चालविलेल्या प्रा. शा. (सप्रयोजन) या लेखाशीर्षाखाली वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, बीड यांनी प्रमाणित केले आहे.

१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड यांच्या शिफारशीनुसार व वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र.४ द्वारे वैद्यकीय अधिक्षक, सुमनजंली नर्सिंग होम, औरंगाबाद यांनी प्रमाणित केल्यानुसार तसेच, मा.सह दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, माजलगावं जि. बीड यांनी

कै. (श्री.) यादव यांचे कायदेशिर वारस म्हणून घोषित केल्यानुसार (१) गिता शिवाजी यादव (पत्नी) (२) समर्थ शिवाजी यादव (मुलगा) (३) संचिता शिवाजी यादव (मुलगी) (४) आश्राबाई दत्तात्रय यादव (आई) (५) दत्तात्रय बोळीराम यादव (वडील) यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

११. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसारअनौपचारिक संदर्भ क्र.१३९/व्यय-५, दि. २५/०२/२०२५ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

> “मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर.”

१२. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी संबंधितांना प्रत्यक्षपणे प्रदान झाल्याबाबतची माहिती प्रमाणीकरणासह सादर करावी.

१३. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२५०३२७१९३२१५७७२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e891811863 4069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9 C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.27 19:33:09 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-**

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य,पुणे
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), बीड

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस.एम.४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती गिता शिवाजी यादव, रा. श्रृंगारवाडी ता. माजलगावं जि. बीड-४३१ १३१
४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र.८३/२०२३)